कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळ (प्रतिबंध, मनाई व निवारण) अधिनियम-२०१३ मधील तरतुदीनुसार अंतर्गत तक्रार निवारण समिती गठित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**राज्य लॉटरी संचालनालय, वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. मरालॉ २०२३/प्र.क्र.९४/लॉटरी-३**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६/०७/२०२३

वाचा : १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही १०९९/७३/मकअ, दि.१९/०५/१९९९.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही १००३/प्र.क्र.६/२००३/मकअ, दि.०५/०१/२००४.
३. केंद्र शासनाचा कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३, दि.२२/०४/२०१३ व नियम दि.०९/१२/२०१३.
४. महिला व बाल विकास विभाग, शासन परिपत्रक क्र.मकक-२०१०/प्र.क्र.४६/मकक, दि.११/०६/२०१०.
५. महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मकचौ-२०१३/ प्र.क्र.६३/मकक, दि.१९/०६/२०१४.

**प्रस्तावना** –

केंद्र शासनाकडून कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३, दि.२२/०४/२०१३ व त्यांतर्गत दि.०९/१२/२०१३ रोजी नियम प्रसिध्द करण्यात आलेले आहेत. त्यानुसार महिला व बाल विकास विभागाच्या क्र.मकचौ-२०१३/प्र.क्र.६३/मकक, दि.१९/०६/२०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदींनुसार वित्त विभागाच्या नियंत्रणाखालील राज्य लॉटरी संचालनालयात कार्यरत असलेल्या महिला अधिकारी/ कर्मचारी यांच्या तक्रारींबाबत चौकशी करण्यासाठी “अंतर्गत तक्रार निवारण समिती” गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** –

कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम-२०१३ अंतर्गत राज्य लॉटरी संचालनालयामध्ये खालीलप्रमाणे अंतर्गत तक्रार निवारण समिती गठित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | समितीमधील अध्यक्ष/ सदस्यांची नावे व पदनामे | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | श्रीम. स्वाती सं.विचारे, उपसंचालक राज्य लॉटरी तथा अवर सचिव वित्त विभाग | अध्यक्ष |
| २ | श्रीम. शीला कि.यादव, कक्ष अधिकारी | सदस्य सचिव |
| ३ | श्री. रोहित सोनवणे, राज्य लॉटरी अधिकारी तथा कक्ष अधिकारी | सदस्य |
| ४ | श्रीम. किरण श्री.कांबळे, सहायक राज्य लॉटरी अधिकारी | सदस्य |
| ५ | ॲड.पद्मा शेलटकर, मॅनेजिंग ट्रस्टी ऑफ विस्डम चॅरिटेबल ट्रस्ट ॲड डायरेक्टर ऑफ तर्पण फाऊंडेशन | अशासकीय सदस्य |

सदर समितीची कार्यकक्षा/कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील :-
अ) कामाच्या ठिकाणी होणाऱ्या लैंगिक सतावणूकीस प्रतिबंध करण्यासाठी कालबध्द कार्यक्रम राबविणे.
आ) केंद्र शासनाने प्रसिध्द केलेली मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाने महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मध्ये यासंदर्भात केलेल्या सुधारणा/सूचनांना (म्हणजेच लैंगिक सतावणूकी संदर्भातील सूचनांना ) प्रसिध्दी देणे.
इ) राज्य लॉटरी संचालनालयातील महिला अधिकारी/कर्मचारी यांच्या नियतकालिक बैठका घेऊन त्यांना झालेल्या लैंगिक सतावणुकीच्या तक्रारींची दखल घेणे, चौकशी करणे.
ई) अशा तक्रारीत तथ्य आढळून आल्यास त्याबाबतचा शोध घेऊन दोषी कर्मचाऱ्यांवर कारवाई, शिस्तभंगाची कार्यवाही करण्याकरिता शिफारस करणे.
उ) अशा प्रकारच्या कारवाईचा/ शिस्तभंगाच्या कार्यवाहीचा आढावा घेणे.
ऊ) यासंबंधी केलेल्या कामाचा वार्षिक अहवाल शासनाला सादर करणे.

२. राज्य लॉटरी संचालनालयातील महिला अधिकारी/कर्मचारी यांना त्यांच्या तक्रारी, समितीच्या अध्यक्ष/सदस्य सचिव यांचेकडे सादर करता येतील. अशासकीय संघटना किंवा संघ यामधील नियुक्त केलेल्या सदस्याला अंतर्गत समितीच्या प्रत्येक कामाच्या दिवसासाठी रक्कम रुपये २००/- (दोनशे) इतका भत्ता आणि सदर सदस्यांना रेल्वेच्या थ्री-टायर वातानुकूलीत श्रेणी किंवा वातानुकूलीत टॅक्सी/ बस किंवा ऑटो रिक्शा यामधून प्रवास करण्यास जितका खर्च येईल त्यापैकी जो खर्च कमी असेल तो प्रदान करण्यात येईल. त्यानुसार अशासकीय सदस्यांनी अंतर्गत समितीच्या प्रत्येक कामाच्या दिवसासाठी उपस्थित राहून समितीच्या अध्यक्ष/ सदस्य सचिव यांना सादर केलेली देयके प्रचलित कार्यपध्दती व नियम यांचा अवलंब करून लेखाधिकारी (रोख), राज्य लॉटरी संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत अदा करण्यात येतील.

राज्य लॉटरी संचालनालयाच्या कार्यालयात गठित करण्यात आलेल्या "अंतर्गत तक्रार निवारण समिती"कडे महिला अधिकारी/ कर्मचारी यांना लैंगिक छळवणूकीची तक्रार करता येईल. अंतर्गत समितीचा अध्यक्ष पदस्थ अधिकारी किंवा कोणताही सदस्य या अधिनियमाच्या कलम १६ मधील तरतुदींचे उल्लंघन करीत असेल किंवा अपराधासाठी दोषी ठरविलेला असेल किंवा त्या त्या वेळी अंमलात असलेल्या कोणत्याही कायद्यान्वये त्याच्या विरुध्द अपराधाची चौकशी प्रलंबित असेल किंवा तो कोणत्याही शिस्तभंगाच्या कारवाईमध्ये दोषी असल्याचे आढळून आला असेल किंवा त्याच्या विरुध्द शिस्तभंगाची कारवाई प्रलंबित असेल किंवा अशा रितीने त्याने पदावर राहून सार्वजनिक हितास बाधा पोहोचवून त्यांच्या पदाचा दुरुपयोग केला असेल अशा अध्यक्ष पदस्थ अधिकाऱ्यास किंवा, यथास्थिती सदस्यास, नियुक्ती अधिकारी पदावरुन कमी करु शकतील आणि अशा रितीने रिक्त झालेले पद किंवा कोणतेही नैमित्तिक कारणाने रिक्त झालेले पद हे या कलमाच्या तरतुदीनुसार नव्याने नामनिर्देशन करुन भरता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७०६१५३१२०२६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SWATI SANDEEP VICHARE

Digitally signed by SWATI SANDEEP VICHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=43b3606c6050b27243664a8a3f57ce418109cfdad57c4f b2b4af38a1a993b1af, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05F5493C23DE353B8B7E1736AB8170506FFB95B 6E8FE48367B0CD0486E7B36E6, cn=SWATI SANDEEP VICHARE
Date: 2023.07.06 15:32:12 +05'30'

**( स्वाती विचारे )**
**उपसंचालक, राज्य लॉटरी तथा अवर सचिव,**
**वित्त विभाग**

**प्रति,**

१. अध्यक्ष, सदस्य सचिव व सर्व सदस्य, अंतर्गत महिला तक्रार निवारण समिती, राज्य लॉटरी संचालनालय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. ॲड.पद्मा शेलटकर, मॅनेजिंग ट्रस्टी ऑफ विस्डम चॅरिटेबल ट्रस्ट ॲड डायरेक्टर ऑफ तर्पण फाऊंडेशन

**प्रत :**

१. अ.मु.स. ( ले.व को.) यांचे खाजगी स्वीय सहायक.

२. निवडनस्ती, लॉटरी-३.